| To control the probable excess in estimate of Administrative Approval proposals and to avoid increase in approved cost | प्रकल्पांच्या प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात होणारी संभाव्य वाढ नियंत्रित करणे व मान्यताप्राप्त किंमतीमध्ये होणारी वाढ टाळण्याबाबत |
|---|---|

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन परिपत्रक क्रः सुप्रमा/०४११/(२६२/२०११)/मोप्र-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० ऑगस्ट, २०११

**प्रस्तावना --**

जलसंपदा विभागांअंतर्गत विविध प्रकल्पांचे प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव तयार करताना सखोल सर्वेक्षणाअभावी प्रकल्पाच्या खर्चात वाढ झाल्याचे निदर्शनास येते. तसेच, प्रशासकीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर संकल्पचित्रातील बदल, व्याप्तीतील बदल, भूसंपादनातील अडचणी इ. कारणांमुळे प्रकल्प खर्चात वाढ होऊन प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता निर्माण होते. या बाबींची वेळीच काळजी घेतल्यास प्रकल्प किंमतीतील वाढ मर्यादित राहील. प्रकल्पांचे सुधारित प्रशासकीय मान्यतेचे अहवाल योग्य पध्दतीने तयार होतील व पर्यायाने विहित वेळेत मान्यता मिळणे शक्य होईल. याचा विचार करुन खालीलप्रमाणे सूचना निर्गमीत करण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रकः**

(१) प्रशासकीय मान्यतेच्या वेळी ब-याचदा ढोबळमानाने प्राथमिक सर्वेक्षण करून प्रकल्प मंजूर केला जातो व त्यात पुढे सविस्तर सर्वेक्षणाअंती बदल होतात. असे प्रकार घडू नयेत म्हणून प्रकल्पाचे अंदाजपत्रक तयार करण्यापूर्वी आवश्यक ते विस्तृत सर्वेक्षण व अन्वेषण करण्यात यावे. **या सर्वेक्षण अन्वेषणासाठी अंदाजपत्रक तयार करुन, सदर खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रथमतः प्रशासकीय मान्यता प्राप्त करण्यात यावी.** सविस्तर सर्वेक्षण व अन्वेषणाचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर त्या आधारे प्रकल्पाचे तपशिलवार अंदाजपत्रक तयार करुन प्रशासकीय मान्यतेचा निर्णय घेण्यात यावा. तसेच, प्रकल्पखर्चाची वाढ टाळण्यासाठी प्रकल्पाच्या प्रशासकीय मान्यतेवेळेसच मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक यांचेकडून प्रकल्पाच्या प्रमुख उपांगाचे (जसे की

माती धरण, दगडी धरण, सांडवा इ. चे) संकल्पन अंतिम होणे आवश्यक आहे, जेणेकरुन अशा प्रमुख उपांगाच्या संकल्पचित्रातील बदलामुळे होणारी प्रकल्पाच्या खर्चातील वाढ मर्यादीत राहू शकेल.

(२) प्रकल्पाकरिता आवश्यक जमिनीचे संपादन केल्याशिवाय त्यावरील कामाकरिता निविदा प्रक्रिया सुरु करण्यात येऊ नये. तसेच जमिनीच्या संपादनाशिवाय त्यावरील प्रकल्पाच्या कोणत्याही दायित्वास मान्यता देण्यात येऊ नये.

(३) प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर प्रकल्पाच्या व्याप्तीत किंवा इतर तरतूदींमध्ये बदल संभवत असल्यास अशा बदलाबाबत प्रथमः स्वतंत्र सविस्तर प्रस्ताव तयार करण्यात यावा व अशा प्रस्तावास सक्षम स्तरावर (महामंडळ/शासन ज्यांनी मूळ प्र.मा. दिलेली आहे) तत्त्वतः मान्यता प्राप्त करुन घ्यावी. अशा मान्यतेनंतरच संबंधित कामे हाती घेण्यात यावीत. असे सर्व मान्यता प्राप्त बदल अंतर्भूत करुन सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव वेळीच तयार करण्यात यावेत. प्रकल्पावरील खर्च प्रशासकीय मान्यतेपेक्षा जास्त होण्यापुर्वी प्रकल्पास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

(४) वित्त विभागाने वित्तीय अधिकार नियमपुस्तिका,१९७८ भाग-पहिला, उप विभाग-एक ते पाच (सर्व विभागांना समान असलेले वित्तीय अधिकार) मध्ये दि.१५ मे,२००९ च्या शासन निर्णय क्र.विअप्र-१०.८८/प्र.क्र.७०/२००८/विनियम व्दारे सुधारणा केलेल्या आहेत. त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे ज्या प्रकरणी प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा ओलांडली जाईल त्या प्रकरणी संबंधित अधिकाऱ्यास जबाबदार धरण्यात येईल. वित्तीय अधिकाराच्या मर्यादा या मापदंडात असणाऱ्या प्रकल्पाकरिता असल्याने जे प्रकल्प मापदंडात बसत नाही अशा सर्वच प्रकल्पांकरिता व्यय अग्रक्रम समितीची मान्यता आवश्यक आहे.

(५) यापुढे महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील अनुच्छेदानुसार तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेतील अटी व शर्तीनुसारच विभागाने काटेकोरपणे खर्च करणे आवश्यक आहे. प्र.मा. प्राप्त रकमेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. विशिष्ट प्रकरणी सु.प्र.मा. प्राप्त करण्यामध्ये काही कालावधी लागणार असल्यास व प्र.मा. प्राप्त रकमेपेक्षा जास्तीचा खर्च करणे अपरिहार्य असल्यास अशा प्रकरणी वाढीव खर्च करणेसाठी वित्त विभागाची / शासनाची पुर्वसंमती घेणे आवश्यक आहे.

उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याची खबरदारी घ्यावी अन्यथा याबाबत संबंधितांस जबाबदार धरण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

सदर परिपत्रक शासनाच्या बेवसाईटवर २०११०८१०१७३००००१ ठेवण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सु. ल. पाटील )
मुख्य अभियंता (द.व प्र.) व सह सचिव

प्रत,

महालेखापाल १/२, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म. वगळून) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (कृ.खो.पा.म.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (खारभूमी) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, (वित्त) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, लाभक्षेत्र विकास, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, खारभूमी जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मा. विधान सभा/ विधान परिषद सदस्य, सर्व
स्वीय सहायक, मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(दवप्र)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(जसं) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(कृपातंल)व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मु.अ.(पा), व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक उपसचिव/अवरसचिव/उपअभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व तांत्रिक कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रत, आवश्यक कार्यवाहीसाठी,

कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था, नाशिक.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय मुख्य अभियंता
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग, येरवडा, पुणे.
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय अधीक्षक अभियंता
जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यकारी अभियंता

मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ